क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवरील उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, गट-अ या पदावर पदोन्नतीबाबत...
श्री.युवराज नाईक

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : संक्रीआ १०२२/प्र.क्र.८७/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २० ऑगस्ट, २०२४

**संदर्भ** :- शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक १८/०८/२०२३ व शासन आदेश, समक्रमांक, दिनांक ११/०९/२०२३

**आदेश** :-

शासनाच्या संदर्भाधीन दिनांक १८/०८/२०२३ रोजीच्या निर्णयानुसार श्री.युवराज नाईक यांना उप संचालक, पुणे (मुख्यालय) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली होती. श्री.नाईक हे आयुक्त (क्रीडा) यांनी दिनांक २३/०८/२०२३ रोजी निर्गमित केलेल्या आदेशानुसार दिनांक २४/०८/२०२३ रोजी उपरोक्त पदावर हजर झाले आहेत. शासनाच्या संदर्भाधीन दिनांक ११/०९/२०२३ रोजीच्या आदेशानुसार श्री.नाईक यांचे पदोन्नतीनंतरचे पदस्थापनेचे आदेश रद्द करण्यात आले आहेत. आता, श्री.युवराज नाईक (नियुक्तीच्या प्रतीक्षेत) यांना खालीलप्रमाणे नव्याने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | मूळ जातीचा प्रवर्ग | सुधारित पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री.युवराज नाईक, उपसंचालक (नियुक्तीच्या प्रतीक्षेत) | वि.जा.(अ) | उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे विभाग, पुणे. |

२. श्री.नाईक यांनी पदस्थापनेच्या पदावर त्वरीत रूजू व्हावे व संबंधित अधिकारी रूजू झाल्याचा दिनांक आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी शासनास कळवावा.

३. श्री.युवराज नाईक यांचा जिल्हा क्रीडा अधिकारी या पदावरील दिनांक २३/०६/२०२३ ते दिनांक २३/०८/२०२३ व उपसंचालक पदावरील दिनांक २४/०८/२०२३ पासून उक्त पदावर रूजू होईपर्यंतचा सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी कर्तव्य काळ म्हणून नियमित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. श्री.युवराज नाईक यांचेकडे उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, लातूर विभाग, लातूर या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०८२०१७३७०००२१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHOK HANMANLU DAMAYYAWAR
Date: 2024.08.20 17:52:31 +05'30'

**( अशोक दमय्यावार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

(२) मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे खाजगी सचिव,
(३) अपर मुख्य सचिव (क्रीडा), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
(४) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
(५) संबंधीत अधिकारी (संचालनालयामार्फत),
(६) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत),
(७) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत),
(८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
(९) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
(१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/लातूर,
(११) निवड नस्ती (क्रीयुसे-२).